मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई यांच्या अधिपत्याखालील दादर भोईवाडा, मुंबई येथे नवीन इमारत तयार होईपर्यंत परेल भोईवाडा, क्रॉस रोड, बृहन्मुंबई महानगरपालिकेची शाळेची इमारत भाडेतत्वावर घेण्यास व त्याअनुषंगाने येणाऱ्या खर्चासाठी तसेच कुर्ला येथील न्यायालयीन इमारतीची दुरुस्ती/ नुतनीकरणासाठी निधीची उपलब्धता व निधी वितरीत करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
विधि व न्याय विभाग
**शासन निर्णय क्र. पुरमा ११२१/५१४/प्र.क्र.१३१/कार्यासन ११**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: २४ जानेवारी, २०२२

वाचा:-१) मुख्य महानगर दंडाधिकारी यांचे पत्र क्र.१९२९/२०२१, दि.१०/११/२०२१

२) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र.न्याइमा-१११९/८३०/प्र.क्र.१७९/कार्यासन ११, दि.८/११/२०२१

३) मुख्य महानगर दंडाधिकारी यांचे ज्ञापन क्र.१८०७/२०२१, दि.२०/१०/२०२१

४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.पूरक-२०२१/प्र.क्र.१०६/अर्थ-३,दि.३/१/२०२२

**प्रस्तावना:-**

मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई यांच्या अधिपत्याखालील दादर भोईवाडा, मुंबई येथे नवीन इमारत तयार होईपर्यंत परेल भोईवाडा, क्रॉस रोड, बृहन्मुंबई महानगरपालिकेची शाळेची इमारत भाडेतत्वावर घेण्यास संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तसेच कुर्ला येथील न्यायालयीन इमारतीची दुरुस्ती/ नुतनीकरणासाठी संदर्भ क्र.३ च्या ज्ञापनान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई यांनी मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई यांच्या अधिपत्याखालील दादर भोईवाडा, मुंबई येथे नवीन इमारत तयार होईपर्यंत परेल भोईवाडा, क्रॉस रोड, बृहन्मुंबई महानगरपालिकेची शाळेची इमारत भाडेतत्वावर घेण्यास व त्याअनुषंगाने येणाऱ्या खर्चासाठी रु.२,०७,०८,६२९/- इतक्या व कुर्ला येथील न्यायालयीन इमारतीची दुरुस्ती/ नुतनीकरणासाठी रु.८५,०२,४७३/- इतक्या निधीची मागणी संदर्भ क्र.१ च्या पत्रान्वये केली होती. त्यानुसार पुरवणी मागणीचा प्रस्ताव वित्त विभागामार्फत विधानमंडळास सादर करण्यात आला होता. यानुषंगाने निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई यांच्या अधिपत्याखालील दादर भोईवाडा, मुंबई येथे नवीन इमारत तयार होईपर्यंत परेल भोईवाडा, क्रॉस रोड, बृहन्मुंबई महानगरपालिकेची शाळेची इमारत भाडेतत्वावर घेण्यास व त्याअनुषंगाने येणाऱ्या खर्चासाठी तसेच कुर्ला येथील न्यायालयीन इमारतीची दुरुस्ती/ नुतनीकरणासाठी लेखाशीर्ष (२०१४ ०२३४) खाली २७- लहान बांधकामे, १३- कार्यालयीन खर्च व १४-भाडेपट्टी व कर या

उद्दिष्टांतर्गत पुढील तक्यात नमूद केल्याप्रमाणे पुरवणी मागणी विधान मंडळाने मंजूर केलेली आहे . सदर निधी उपलब्ध करुन देण्यास व वितरणास वित्त विभागाने मान्यता दिलेली आहे. त्यानुसार सदर निधी नियंत्रक अधिकारी, मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई यांना उपलब्ध करुन देण्यास व वितरणास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | प्रस्ताव | २०१४ ०२३४ लेखाशिर्षाखालील उद्दिष्ट | मंजूर पूरक मागणी (रुपये) |
|---|---|---|---|
| १ | मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई यांच्या अधिपत्याखालील कुर्ला येथील न्यायालयीन इमारतीची दुरुस्ती/ नुतनीकरण | २७- लहान बांधकामे | ८५,०२,०००/- |
| २. | दादर, भोईवाडा, मुंबई येथे नवीन न्यायालय इमारत तयार होईपर्यंत परेल भोईवाडा, क्रॉस रोड, बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या शाळेची इमारत (तळमजला + ५ मजले) भाडेतत्वावर घेण्यास तसेच त्याअनुषंगाने येणाऱ्या खर्चास मंजूरी | २७- लहान बांधकामे | ८२,२४,०००/- |
| | | १३-कार्यालयीन खर्च | ३९,०५,७५०/- |
| | | १४-भाडेपट्टी व कर | ७२,३४,०००/- |
| **(अक्षरी रुपये दोन कोटी अठ्ठ्याहत्तर लाख पासष्ट हजार सातशे पन्नास फक्त)** | | | **२,७८,६५,७५०/-** |

२. सदर पुरवणी मागणी, “मागणी क्र.जे-१, २०१४, न्यायदान,(००) १०७ इलाखा शहर दंडाधिकारी न्यायालये, (००), (००) (०१) इलाखा शहर दंडाधिकारी न्यायालये (अनिवार्य) (२०१४ ०२३४) २७- लहान बांधकामे १३- कार्यालयीन खर्च व १४-भाडेपट्टी व कर” या लेखाशिर्षाखाली मंजूर झालेली आहे. तसेच हा निधी नियंत्रक अधिकारी, मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई (जे- ००४१) यांना वितरीत करण्यात येत आहे. सदरचा निधी ज्या प्रयोजनाकरिता योजिला आहे त्याच विवक्षित बाबींसाठी खर्च करणे अपेक्षित आहे.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २५/२०२२/व्यय ५, दि.७/१/२०२२अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०१२४१८१४१६८११२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HEMANGI AJIT SHETYE

Digitally signed by HEMANGI AJIT SHETYE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a80fef4908844f3f0e391754221ba7b421d28c86653344150a5e31030c791f4b, pseudonym=A05C54A04D3293F61521D5E463E799884D63F286, serialNumber=7328C41D6A5210C49CCE931861626D508AE4537D7BB43F92AC6D5796595AADB8, cn=HEMANGI AJIT SHETYE
Date: 2022.01.24 18:16:04 +05'30'

( हेमांगी शेट्ये )
कार्यासन अधिकारी

**प्रति,**

१) प्रबंधक (निरीक्षणे-२),उच्च न्यायालय, मुंबई.

२) मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा) महाराष्ट्र, मुंबई.
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५) निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
६) वित्त विभाग, कार्यासन-व्यय ५/ अर्थ-११, मंत्रालय, मुंबई.
७) विधि व न्याय विभाग, कार्या- २३ व २४, मंत्रालय,मुंबई.
८) निवडनस्ती (कार्यासन ११).